जिल्हा रुग्णालय, जालना येथील विविध कामाचे अंदाजपत्रकास मंजूरी मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१६/ प्र.क्र.५९/ आरोग्य-४
मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

तारीख: ६ फेब्रुवारी, २०१७.

वाचा

१) सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/ कक्ष-३/टे-६/ जिरुजालनाविविधकाम/७३९२-९३/१६, दि.१०.०५.२०१६.

प्रस्तावना

जिल्हा रुग्णालय, जालना येथील विविध दुरुस्ती कामांची एकूण रु.५०,१२,८२३/- इतक्या किंमतीची ५ अंदाजपत्रके शासनास प्राप्त झाली. सदर अंदाजपत्रके व आराखडे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना यांनी प्रमाणित केलेली आहेत. तसेच सदर अंदाजपत्रक व आराखडे सन २०१३-१४ च्या दरसुचिवर आधारीत आहेत. प्रस्तुत अंदाजपत्रकांच्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये जिल्हा रुग्णालय, जालना येथील विविध दुरुस्तीचे अंदाजपत्रकात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सुचनेच्या अधिन राहून खालीलप्रमाणे दुरुस्ती / सुधारणा केलेल्या सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात होणाऱ्या रु.५४,९०,२३५/- इतक्या किंमतीचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी मिळणेबाबतच्या खर्चास मंजुरी देण्यात येत आहे.

सदर अंदाजपत्रकात पुढीलप्रमाणे बाबी समाविष्ट आहेत.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजे रक्कम रु. |
|---|---|---|
| १ | सामान्य रुग्णालय जालना अंतर्गत रस्त्याची दुरुस्ती करणे. भा- १ | १०,९१,८६६/- |
| २ | सामान्य रुग्णालय जालना रुग्णालय कर्मचारी निवासस्थानाअंतर्गत रस्त्याची दुरुस्ती करणे. | ९,६९,७९३/- |
| ३ | सामान्य रुग्णालय जालना टाईप १-निवासस्थान दुरुस्ती करणे. भाग-१ | ११,४९,७९०/- |
| ४ | सामान्य रुग्णालय जालना टाईप १-निवासस्थान दुरुस्ती करणे. भाग-२ | ११,३६,२९१/- |
| ५ | सामान्य रुग्णालय जालना टाईप १-निवासस्थान संरक्षक भिंत दुरुस्ती करणे. | ११,४२,४९५/- |
| | **एकूण** | **५४,९०,२३५/-** |

जिल्हा रुग्णालय, जालना येथील विविध दुरुस्ती कामांच्या अंदाजपत्रक व आराखड्यांच्या एकूण रु.५४,९०,२३५/- (अक्षरी रुपये चौपन्न लक्ष नव्वद हजार दोनशे पसतीस फक्त) इतक्या रक्कमेस खालीलप्रमाणे अटीं व शर्तीच्या अधिन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दर्शविलेली आहे.

<u>अटी व शर्ती</u>

१) संरक्षण भिंतीचे संकल्पन करुन त्या संकल्पनास सक्षम अधिकाऱ्यांची मंजूरी घेणे बंधनकारक राहील. तसेच पाचही उप अंदाजपत्राकांच्या निविदा एकत्रित करुन एका निविदेद्वारे काम हाती घेण्यात यावे.
२) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तू विशारदाकडून मंजूरी घेवूनच काम सुरु करावे.
३) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रमांक: इएनव्ही-२०१३/प्र.क्र.११७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

सदर बांधकामांवरील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध करून देण्यात यावा.

**मागणी क्र. एच-८**

| | |
|---|---|
| ४२१०- | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०१- | नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य ) |
| ११०- | रूग्णालये व दवाखाने |
| (१)(अ)- | पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-इमारती |
| (००) (०१)- | मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ ) |
| ५३- | मोठी बांधकामे |

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५४८/१६/ इमा-३, दि.१.१२.२०१६ अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार आणि वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०६१३०४२३७६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2017.02.06 15:14:16 +05'30'

**श्री. अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा (औरंगाबाद मंडळ), औरंगाबाद.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जालना
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
९. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
१०.विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव (आरोग्य-३ ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती ( आरोग्य-४ ).